महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेतील सुधारणा कामांच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
नगर परिषद, तुमसर, जि.भंडारा.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
### शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०२१/प्र.क्र.१५०/पापु.२२

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, फोर्ट, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १९ जानेवारी, २०२२

**वाचा :**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१२/प्र.क्र.१५४/पापु-२२, दि.१५.०३.२०१२
४) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ.(प्र.व्य.स.से.)/पुणे/तांशा-२/१८६२, दि.२४.०९.२०१२.
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ.(प्र.व्य.स.से.)/पुणे/तांशा-२/२४०४, दि.२६.१२.२०१२.
६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१२/अनुदान/प्र.क्र.३५५/पापु-२२, दि.२५.०५.२०१२
७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०१४/प्र.क्र.७४/पापु-२२, दि.०४.०३.२०१४
८) मुख्याधिकारी, तुमसर नगर परिषद यांचे पत्र जावक क्र.१८४/तुन/पापुवि/२०१७, दि.०१.०३.२०१७
९) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.मजीप्रामंना/तांशा-२/१८१०/२०२०, दि.१८.१२.२०२०.
१०) मुख्याधिकारी, नगर परिषद, तुमसर यांचे पत्र जावक क्र.१३२/तुन/पापुवि/२०२१, दि.०७.०१.२०२१
११) मुख्याधिकारी, नगर परिषद, तुमसर यांचे पत्र जावक क्र.८१/तुन/पापुवि/२०२१, दि.१८.०८.२०२१.

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दि.१५.०३.२०१२ अन्वये तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.९२,७३,०००/- इतक्या किंमतीच्या सुधारणा कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात

आली आहे. तुमसर ही “ब” वर्ग नगर परिषद आहे. त्याप्रमाणे सदर योजनेस रु.८३,४६,०००/- अनुदान (९०%) अनुज्ञेय असून तुमसर नगर परिषदेच्या स्वहिश्श्याची (१०%) रक्कम रु.९,२७,०००/- इतकी आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.४ दि.२४.०९.२०१२ च्या पत्रान्वये तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु.७३,७७,६५७/- इतक्या निव्वळ किंमतीस तांत्रिक मान्यता दिली व तद्दनंतर सदर मान्यता रद्द करुन संदर्भ क्र.५, दि.२६.१२.२०१२ च्या पत्रान्वये तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारणा कामांस एकूण रु.७५,२१,८८२/- इतक्या निव्वळ किंमतीस सुधारीत तांत्रिक मान्यता दिलेली आहे. सदर कामाची मे.ए.डी.सी.सी.इन्फोकॅन्ड प्रा.लि., नागपूर यांची कमी दराची निविदा तुमसर नगर परिषदेने दि.०६.१२.२०१२ च्या सभेत ठराव क्र.४ अन्वये मंजूर केलेली आहे. मुख्याधिकारी, नगर परिषद, तुमसर यांनी दि.०७.१२.२०१२ च्या कार्यादेशाद्वारे संबंधित ठेकेदारास एकूण रु.७३,०२,७९८/- चे कार्यादेश दिले आहेत. तुमसर नगर परिषदेने स्वहिश्श्याची संपुर्ण रक्कम रु.९,२७,०००/- संबंधित बँक खात्यामध्ये जमा केली असून शासन निर्णय, दि.२५.०५.२०१२ अन्वये रु.४५,०२,०००/- व शासन निर्णय, दि.०४.०३.२०१४ अन्वये रु.२९,१७,०००/- असे मिळून एकूण रु.७४,१९,०००/- इतके अनुदान तुमसर नगर परिषदेस वितरीत करण्यात आले आहे.

आता अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांनी दि.१८.१२.२०२० च्या पत्रान्वये रु.९२,९५,०९७/- इतक्या निव्वळ किंमतीस व रु.९९,३२,३७८/- इतक्या ढोबळ किमतीस सुधारीत तांत्रिक मान्यता दिलेली आहे. तुमसर नगर परिषदेने सादर केलेल्या कमी / जास्त पत्रकानुसार (Excess / saving statement) वाढीची कारणे पुढीलप्रमाणे आहेत. पाणी लेखा परीक्षण - मे.ए.डी.सी.सी. इन्फोकॅन्ड प्रा.लि., नागपूर यांच्या निविदेची अंदाजपत्रकीय किंमत ८.५% जादा दराने असल्यामुळे वाढ झालेली आहे.फ्लोमिटर बसविणे - प्रत्यक्षात पाईप व्यासानुसार फ्लोमीटर बसविण्यात आल्यामुळे व काही ठिकाणी नव्याने फ्लोमीटर लावण्यात आल्यामुळे व त्यासाठी लागणारे साहित्य जास्तीचे लागल्यामुळे या उपांगामध्ये वाढ झालेली आहे. हायड्रॅालिक मॉडेलिंग - नगरपरिषदेची हद्दवाढ झाल्यामुळे अंदाजपत्रकापेक्षा प्रत्यक्षात नोडसची संख्या ७४७ वरुन ९९७ झाली आहे. मुख्याधिकारी, तुमसर नगर परिषद यांनी रु.८३,५७,०००/- इतक्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केले आहे. कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, गोंदियां यांनी सदर योजनेंतर्गत मंजूर सुधारणा कामे १००% पुर्ण झाली असल्याचे विवरणपत्र सादर केले आहे. तरी मुख्याधिकारी, नगर परिषद, तुमसर यांनी दि.७.१.२०२१ व दि.१८.८.२०२१ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने सदर बाबी विचारात घेऊन शासन निर्णय दि.१५.०३.२०१२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या तुमसर पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियांनातर्गत, शासन निर्णय, दि.१५.३.२०१२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेच्या रु.९९,३२,३७८/- (रुपये नव्यान्नव लाख बत्तीस हजार तीनशे अठ्ठयाहत्तर फक्त) इतक्या किंमतीच्या सुधारणा कामांच्या प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मान्यता

देण्यात येत आहे. तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेसाठी उपांगनिहाय मंजूर व सुधारित किंमतीचे विवरण खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | उपांगाचे नांव | किंमत रुपये |
|---|---|---|
| **१** | **सुधारणा कामे** | |
| | ग्राहक सर्वेक्षण | रु.३,८९,८५७ |
| | पाणी लेखा परिक्षण | रु.१४,७५,६०० |
| | ऊर्जा लेखा परिक्षण | रु.२,४९,५५० |
| | फ्लो मिटर बसविणे | रु.५४,१५,८२८ |
| | जी.आय.एस.मॅपींग | रु.६,२६,५१७ |
| | हैड्रोलिक मॉडेलिंग | रु.११,३७,७४५ |
| | **एकूण किंमत** | **रु.९२,९५,०९७** |
| | **७.५% ई.ॲण्ड पी. चार्जेस** | **रु.६,३७,२८१** |
| | **एकूण ढोबळ किंमत** | **रु.९९,३२,३७८** |

अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांनी दि.१८.१२.२०२० च्या पत्रान्वये महाराष्ट्र सुजल व निर्मल योजनेंतर्गत तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण किंमतीत ७.११ टक्क्यांनी वाढ झालेली असून, त्यानुषंगाने रु.९९,३२,३७८/- इतक्या ढोबळ किंमतीच्या सुधारणा व अनुषंगिक कामाच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरी दिली आहे.

२. तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेतील सुधारीत कामाचा वित्तीय आकृतिबंध खालीलप्रमाणे आहे.

**(रक्कम रुपयात)**

| **नागरी संस्थेचे नांव व वर्ग** | **योजनेची एकूण किंमत** | **राज्य शासनाकडून अनुज्ञेय अनुदान (९०%)** | **नागरी संस्थेने निकषानुसार भरावयाची रक्कम (१०%)** |
|---|---|---|---|
| तुमसर नगर परिषद,जि. भंडारा, “ ब ” वर्ग | ९९,३२,३७८ | ८९,३९,१४० | ९,९३,२३८ |

३. तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेतील मंजूर सुधारणा कामास शासन निर्णय दि.१५.०३.२०१२ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, नागपूर यांचे संदर्भाधिन क्र.९ येथील पत्रात नमुद केलेल्या अटींची पूर्तता करणे तुमसर नगरपरीषदेस बंधनकारक राहील.

४. तुमसर शहर पाणी पुरवठा योजनेतील सुधारीत कामांचा खर्च मागणी क्र. वाय-०२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यांदीना सहाय्य-राज्य योजना-(०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान

(२२१५ १६४७), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्याखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. महाराष्ट्र सुजल निर्मल अभियांनातर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी, शासन पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. नापापु २००८/प्र.क्र. ०१/पापु-२२ दि. २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतुदींचा अवलंब करणे आवश्यक राहील.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक १७.०४.२०१५ च्या क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/विनियम भाग-२ या शासन निर्णयातील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.६ (सहा) परिच्छेद क्रमांक २७ (अ) अन्वये विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०११९१२४३३६२६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

POPAT BHANUDAS JAGADALE

Digitally signed by POPAT BHANUDAS JAGADALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d681616973b9509460f63155f2d1d3dffe33d046d2adc8504f466852619624e, pseudonym=DD30C0827CDC59A4ECB71996AF188F1DA9802A3D, serialNumber=48EF41A6A6D899B8BCF71B256164BA84DEF4261D73071D543D129EFBC0C5B6FF, cn=POPAT BHANUDAS JAGADALE
Date: 2022.01.19 17:22:03 +05'30'

**( पो.भा. जगदाळे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.

१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) ओल्ड सी.जी.ओ.इमारत, न्यु मरीन लाईन्स, १०१, महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०.
११) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) भारतीय लेखा व लेखापरीक्षा विभाग कार्यालय, सिव्हील लाईन्स, वेस्ट हायकोर्ट रोड, नागपूर- ४४० ००१.
१२) विभागीय आयुक्त, महसूल विभाग, नागपूर.
१३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, नरीमन पॉईट, मुंबई-४०० ०२१.
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. (५ प्रतीसह)
१५) आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालयालय, सर पोचखानवाला रोड, वरळी,मुंबई-३०.
१६) जिल्हाधिकारी, भंडारा.
१७) नियंत्रक अधिकारी तथा उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
१८) आहरण व संवितरण अधिकारी तथा प्रकल्प संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४. (५ प्रतीसह)
१९) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, नागपूर.
२०) जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगरपालिका), जिल्हाधिकारी कार्यालय, भंडारा.
२१) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा.
२२) मुख्याधिकारी, तुमसर नगर परिषद, जि.भंडारा.
२३) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई- ४०० ६१४.
२४) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२५) कक्ष अधिकारी/लेखाधिकारी, पापु-०४,पापु-०५, पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
२६) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई- ४०० ०३२.
**२७)** निवडनस्ती, पापु-२२.